**कोषागारातून रोख देय अनुदान**
स्वच्छ भारत मिशन अंतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे **अनुसुचित जाती** घटकासाठीचे अनुदान वितरीत करण्याबाबत.....
**(लेखाशीर्ष २२१५ ९८२६)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्वभामि १२१४/प्र.क्र.१०७/पापु १६

जी.टी. रूग्णालय संकुल, ७ वा मजला,
टिळक रोड, मंत्रालय, मुंबई- ०१
तारीख: २० जानेवारी, २०१५

वाचा

1) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः स्वभामि-२०१४/प्र.क्र.८८/पापु-८, दि.७ नोव्हेंबर, २०१४.**
2) **केंद्र शासनाचे मंजूरी आदेश : दि.२५.७.२०१४, दि.२६.९.२०१४ व दि.११.१२.२०१४.**

प्रस्तावना

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या (पूर्वीचे निर्मल भारत अभियान) केंद्र हिश्श्यासाठी अनुसुचित जाती घटकाखाली २२१५ ९८२६ या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये अर्थसंकल्पीत रकमेपैकी वितरणासाठी उपलब्ध असलेला रु.१७७८.३२ लक्ष निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर उपलब्ध निधी जिल्हा परिषदांना वितरित करण्यासाठी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांच्याकडे सुपूर्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय

**स्वच्छ भारत मिशन साठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदानासाठी जिल्हा परिषदांना अनुसुचित जातीच्या घटकासाठी स्वच्छता कार्यक्रम राबविण्यासाठी निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत रकमपैकी रु.१७७८.३२ लक्ष सतरा कोटी, अठ्ठ्याहत्तर लक्ष, बत्तीस हजार फक्त) इतके अनुदान पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांच्याकडे सुपूर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे. पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांनी सदर रक्कमेचे या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणत्रानुसार जिल्हा निहाय वाटप करावे.**

२. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून केंद्र शासनाकडून प्राप्त झालेली केंद्र हिश्श्याची रक्कम BEAMS या वित्तीय प्रणाली मार्फत संबंधित यंत्रणांना वितरीत करावयाची आहे. तथापि, पाणी व स्वच्छता

सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे BEAMS प्रणाली उपलब्ध नाही. यास्तव केंद्र शासनाकडून वरील घटकांसाठी प्राप्त झालेली एकूण रु. १७७८.३२ लक्ष एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रु.१७७८.३२ लक्ष (रुपये सतरा कोटी, अठ्ठ्याहत्तर लक्ष, बत्तीस हजार फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर रक्कम रु. १७७८.३२ लक्ष अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करुन स्वतंत्र धनादेशान्वये पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी. पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांनी सदर रक्कमेचे सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार जिल्हानिहाय वाटप करावे.

३. या शासन निर्णयाखालील रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

१) या शासन निर्णयाव्दारे मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे.

२) सदर रक्कम या प्रयोजनार्थ केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सुचनांमधील तरतुदीनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

३) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहीत नमुन्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी.

४) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करावे.

५) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनिस्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, ०२ ग्राम सफाई कार्यक्रम, (०२) (०९) निर्मल भारत अभियान केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत शौचालय बांधणे (अनुसुचित जाती) (केंद्र हिस्सा) (२२१५ ९८२६)" ३१ सहायक अनुदाने, या लेखाशीर्षाखाली घालावा.

५. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.९/वि.घ.यो, दि.१४.१.२०१५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२९/व्यय-३, दि.१६.१.२०१५ प्राप्त सहमतीनुसार मुक्त करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२०१४५२४३०९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.01.20 16:21:29 +05'30'

**(वि.य.गोखले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल- १/२, मुंबई/नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता)
२. विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर .
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
४. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सर्व.
५. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सीबीडी, बेलापूर, नवी मुंबई.
६. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव रिफॉर्म सपोर्ट प्राजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
९. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं), जिल्हा परिषद, सर्व.
१०.नियोजन विभाग, (का.क्र. १४४३) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११.वित्त विभाग, (अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
१४.उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सर्व.
१५.संचालक, लेखा व कोषागार, मुंबई - ४०० ०३२.
१६.कार्यासन क्रमांक पापु-०४, पापु-०८ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१७.निवड नस्ती, कार्यासन क्रमांक पापु-१६.

# विवरणपत्र

शासन निर्णय क्र.स्वभामि-१२१४/प्र.क्र.१०७/पापु-१६, दि. २० जानेवारी, २०१५ सोबतचे सहपत्र.

(रू.लक्ष)

| अ.क्र. | जिल्हा परिषद | सन २०१४-१५ चा सुधारित आराखडा केंद्र हिश्श्याची मागणी | दि. २० जानेवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ३८४०.९३ | ४६.२८ |
| २ | रायगड | १५३९.४५ | ३६.१५ |
| ३ | रत्नागिरी | २१६५.२४ | ५३.६९ |
| ४ | सिंधुदूर्ग | २१४५.०८ | ५८.१२ |
| ५ | पालघर | - | २०.८४ |
| ६ | नाशिक | १७०८.६९ | ४९.२३ |
| ७ | धुळे | ९१३.१० | २०.११ |
| ८ | नंदूरबार | १२३४.९८ | ११.५६ |
| ९ | जळगांव | १७७०.९७ | ४२.१ |
| १० | अहमदनगर | २०३१.३७ | ४९.२३ |
| ११ | पुणे | ३६५८.६८ | ५५.१० |
| १२ | सातारा | १७२८.९२ | ६५.१० |
| १३ | सांगली | २१७९.५८ | ६०.१३ |
| १४ | सोलापूर | ३४३३.९५ | ७०.०० |
| १५ | कोल्हापूर | २२२५.३१ | ८०.०० |
| १६ | औरंगाबाद | २०२७.७२ | ५७.०५ |
| १७ | जालना | १८५५.६३ | ५५.०२ |
| १८ | परभणी | १७२९.५५ | ५०.३१ |
| १९ | हिंगोली | १७२०.१५ | ६५.१० |
| २० | बीड | २१३४.२४ | ६५.३२ |

| अ.क्र. | जिल्हा परिषद | सन २०१४-१५ चा सुधारित आराखडा केंद्र हिश्श्याची मागणी | दि. २० जानेवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|---|
| २१ | नांदेड | १९०७.४९ | ६५.२१ |
| २२ | उस्मानाबाद | २२४९.६३ | ६९.१० |
| २३ | लातुर | २४०६.५९ | ८०.२३ |
| २४ | बुलढाणा | २२३०।४९ | ५९.०५ |
| २५ | अकोला | १८१७.९९ | ४९.३१ |
| २६ | वाशिम | १४०५.७४ | ४५.५९ |
| २७ | अमरावती | १६४५.५६ | ५७.२३ |
| २८ | यवतमाळ | २५३२.४६ | ५१.२३ |
| २९ | वर्धा | ३९०३.३६ | ५५.३८ |
| ३० | नागपुर | २०७२.४९ | ४९.७३ |
| ३१ | भंडारा | १७५८.७१ | ४५.३९ |
| ३२ | गोंदिया | १०१२.०५ | ३५.२१ |
| ३३ | चंद्रपुर | २०६७.३५ | ४९.९९ |
| ३४ | गडचिरोली | ११३१.४५ | ५५.२३ |
| **एकूण** | **३४** | **६८१८४.९०** | **१७७८.३२** |
| **अक्षरी** | | **सहाशे एक्याऐंशी कोटी, चौऱ्याऐंशी लक्ष, नव्वद हजार फक्त** | **सतरा कोटी, अठ्ठ्याहत्तर लक्ष, बत्तीस हजार फक्त** |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.01.20 16:22:02 +05'30'

(वि.य.गोखले)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन